सन २०२३-२४ मध्ये जिल्हा कृषि महोत्सव योजना राबविण्यास मान्यता देण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२३/प्र.क्र.१४१/३अे**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १० जानेवारी, २०२४

वाचा: १) कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.संकिर्ण-२०१६/प्र.क्र.४१/३ अे, दि. ०५/०१/२०१७
२) कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.संकिर्ण-२०१८/प्र.क्र.२२६/३ अे,दि.१६/१०/२०२०
३) वित्त विभाग शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. १२.०४.२०२३
४) संचालक(आत्मा) यांचे पत्र क्र जा.क्र.सं.आत्मा/लेखा/प्र.क्र.१६/४०७/२३, दि.०७.०७.२०२३
५) कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.संकिर्ण-२०२३/प्र.क्र.२९/३ अे, दि. १७.०८.२०२३
६) कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.संकिर्ण-२०२३/प्र.क्र.१४१/३ अे, दि. २३.०८.२०२३
७) संचालक(आत्मा) यांचे पत्र क्र जा.क्र.सं.आत्मा/लेखा/प्र.क्र.१६/जिकृम/७६३/२३, दि.२१.११.२०२३

प्रस्तावना-

शेतक-यांना शासनाच्या विविध कृषि योजना / उपक्रमांची माहिती, संशोधित कृषि तंत्रज्ञान, नाविन्यपुर्ण प्रयोगशील शेतक-यांचे अनुभव, बाजारपेठ व्यवस्थापन, कृषि पुरक व्यवसाय इत्यादीबाबतचे मार्गदर्शन उपलब्ध व्हावे, कृषि प्रदर्शन, कृषि विषयक परिसंवाद आणि अनुभवी शेतकरी / उद्योजकांची व्याख्याने, यशस्वी शेतकरी, शास्त्रज्ञ, तंत्रज्ञ व विचारवंत यांची भेट घडावी व सामान्य शेतक-यांना शंका निरसन करुन घेता यावे, उत्पादक ते ग्राहक थेट विक्री या संकल्पनेवर आधारीत धान्य व खाद्य महोत्सव तसेच फळे, फुले व भाजीपाला महोत्सव इत्यादीचे आयोजन करण्यासाठी मुंबई व मुंबई उपनगर हे जिल्हे वगळता राज्यातील उर्वरित जिल्ह्यांमध्ये दरवर्षी ५ दिवसांचा जिल्हा कृषि महोत्सव साजरा करण्याबाबत दि. १६.१०.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

सन २०२३-२४ करिता जिल्हा कृषि महोत्सव योजनेकरिता लेखाशिर्ष-२४०१ एद९१ अंतर्गत रु. ६.८० कोटी इतकी तरतुद करण्यात आलेली आहे. दि. १७.०८.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यस्तरीय सिल्लोड कृषि महोत्सवाकरिता सन २०२३-२४ च्या एकूण अर्थसंकल्पित निधीतून रू. ५४,७१,२८३ इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. तसेच दि.२३.०८.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये सन २०२३-२४ मध्ये जिल्हा कृषि महोत्सव योजना रू.६.८० कोटी निधीच्या मर्यादेत राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली असुन त्याकरिता एकूण

अर्थसंकल्पित निधीतून रू.८१,२८,७१७ इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. आतापर्यंत एकूण १.३६ कोटी निधी वितरीत करण्यात आला आहे. सदर निधी वगळता जिल्हा कृषि महोत्सवाचे आयोजन करण्याकरिता रू. ५.४४ कोटी इतका निधी शिल्लक आहे. आता संचालक (आत्मा) यांनी सदर योजना राबविण्याकरीता रु.५.४४ कोटी इतका निधी वितरीत करण्याबाबत उपरोक्त पत्रान्वये विनंती केली आहे. तथापि, दि.१२.०४.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्त विभागाने विहीत केल्याप्रमाणे एप्रिल ते जून, २०२३ या पहिल्या तिमाहीसाठी २०% व जुलै ते सप्टेंबर, २०२३ या तिमाहीसाठी २०% व ऑक्टोबर ते डिसेंबर, २०२३ या तिमाहीसाठी ३०% याप्रमाणे सदर योजनेकरिता एकूण अर्थसंकल्पित निधीच्या फक्त ७० टक्के निधी म्हणजेच रु. ४.७६ कोटी निधी उपलब्ध होऊ शकेल. त्यामधून आतापर्यंत वितरीत केलेला निधी (रु. १.३६ कोटी) वगळता रु. ३.४० कोटी निधी उपलब्ध होईल.

त्यानुषंगाने सन २०२३-२४ मध्ये जिल्हा कृषि महोत्सवाचे आयोजन करण्याकरीता रु. ३.४० कोटी एवढा निधी आयुक्त (कृषि) यांना निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे-

**शासन निर्णय-**

१. सन २०२३-२४ मध्ये जिल्हा कृषि महोत्सव योजनेकरिता **रु. ३.४० कोटी (एकूण रु.तीन कोटी चाळीस लक्ष फक्त)** निधी उपलब्ध करून देण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. याकरिता उपलब्ध करुन दिलेला निधी खालील लेखाशिर्षाखाली खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**मागणी क्रमांक डी-३**
**(०१) (५४) जिल्हा कृषि महोत्सव योजना**
**(१००टक्के राज्य योजना) (कार्यक्रम)**
**(२४०१ एद९१)**
**३३-अर्थसहाय्य**

३. शेतक-यांना कृषि विद्यापीठ, कृषि संशोधन केंद्र, यांचे मार्फत आधुनिक तंत्रज्ञानाची माहिती उपलब्ध होते तसेच शेतक-यांना ग्राहकांसाठी थेट विक्रीची संधी मिळते या बाबीचा विचार करता "जिल्हा कृषि महोत्सव योजना", संदर्भाधीन दि.०५.०१.२०१७ च्या शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांचे अवलंब करुन राज्यात राबविण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर योजनेंतर्गत जिल्हा कृषि महोत्सवाचे आयोजन संदर्भाधीन दि. १६.१०.२०२० रोजी निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील तरतूदींनुसार करावे.

५. जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, आत्मा नियामक मंडळ यांनी जिल्हा कृषि महोत्सव आयोजनाचे अहवाल आयुक्त (कृषि) यांना कार्यक्रम आयोजनानंतर एक महिन्यात सादर करावेत. सदर प्राप्त अहवाल विचारात घेऊन आयुक्त (कृषि) यांनी सदर योजनेचा आढावा घेऊन सदर

योजनेच्या मूल्यमापनाचा वार्षिक अहवाल शासनास सत्वर सादर करावा. सदर योजना मूल्यमापनासाठीचे निकष आयुक्त (कृषि) यांनी त्यांचे स्तरावर निश्चित करावेत.

६. हा आदेश नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ५०२/का.१४३१, दि.२६.१२.२०२३ अन्वये आणि वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ०१/व्यय-१, दि.०५.०१.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०११०१२१७४०४७०१ असा आहे.

हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHENDRA SOPAN GHADGE

Digitally signed by MAHENDRA SOPAN GHADGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=9847eac29efa7aa62661b16d1619a1bfaf6d99b23ec6836d8d498d0797965898, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=761BD1B7183B95814545ACE2DBF80778C68C7EE4EF46BAA6EA9B8BD1F47C2642, cn=MAHENDRA SOPAN GHADGE
Date: 2024.01.10 12:17:17 +05'30'

**( महेंद्र घाडगे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. सर्व जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष जिल्हा कृषि महोत्सव संयोजन समिती
३. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा सदस्य जिल्हा कृषि महोत्सव संयोजन समिती
४. सर्व जिल्हा प्रकल्प संचालक, आत्मा तथा सदस्य सचिव जिल्हा कृषि महोत्सव संयोजन समिती
५. सर्व सदस्य, जिल्हा कृषि महोत्सव संयोजन समिती

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
४. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
५. मा.राज्यमंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव
६. मा.मुख्य सचिव
७. सर्व अपर मुख्य सचिव / सर्व प्रधान सचिव / सर्व सचिव, मंत्रालय.
८. सर्व विभागीय आयुक्त.
९. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. कुलगुरु, मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी,
११. कुलगुरु, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला,
१२. कुलगुरु, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जि. अहमदनगर,

१३. कुलगुरु, डॉ.बाळासाहेब सावंत कोंकण कृषि विद्यापीठ, दापोली, जि. रत्नागिरी,

१४. कार्यकारी अधिकारी, एम.आय.डी.सी .लिमिटेड, मुंबई.

१५. सर्व संचालक, महाराष्ट्र राज्य, कृषि आयुक्तालय, पुणे

१६.महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-१ मुंबई, महाराष्ट्र २ नागपूर

१७. महालेखापाल, ( लेखा परिक्षा ) महाराष्ट्र-१ मुंबई, महाराष्ट्र २ नागपूर

१८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क अधिकारी, मुंबई.

१९. वित्त विभाग/ कार्या. , मंत्रालय, मुंबई

२०. नियोजन विभाग/ कार्या., मंत्रालय, मुंबई

२१. सर्व विभागीय कृषि सहसंचालक

२२. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी

२३. सर्व कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद.

२४. सर्व मंत्रालयीन विभाग

२५. कृषि व पदुम विभाग/ कार्या.२ अे, मंत्रालय, मुंबई

२६. निवड नस्ती /कार्या.३ अे कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.

* * *